**सन २००९-१० च्या टंचाई कालावधीसाठी वरोरा शहर नगरपरिषदेच्या (जिल्हा चंद्रपूर) तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता ...**

**महाराष्ट्र शासन,**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. टंचाई २६१०/प्र.क्र. १६/पापु १४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०१०**

**संदर्भ :-** १.शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. टंचाई २०९९/प्र.क्र.१४/पापु १४, दि.२ फेब्रुवारी १९९९.

२. आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन, नागपूर यांचे पत्र क्र. एमयुएन १९(१)/ सी आर ६३(९) कावि १५२०/२००९, दि. २३ डिसेंबर, २००९.

३. जिल्हाधिकारी,जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर यांचे पत्र क्र. कार्या-१०/नपाप्र/टे-१/२००९/१२१७, दि.१८.१२.२००९.

४. शासन पत्र क्र.टंचाई २००९/सं.क्र.२४०३/पापु १४, दि.१२.११.२००९

**प्रस्तावना :-**

सन २०१० च्या टंचाई कालावधीत वरोरा नगरपरिषद (जिल्हा चंद्रपूर ) क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विभागीय आयुक्त, नागपूर यांनी वरोरा (जि. चंद्रपूर) शहरातील टंचाई दूर करण्यासाठी, शहरातील सहा भागांमध्ये १५० मी.मी. व्यासाच्या ६ कुपनलिका व त्या कुपनलिकांवर पंप व पॅनेल बसविणे इ.कामांचा समावेश असलेला रु. २०.१७ लक्ष किंमतीच्या तातडीच्या पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

**शासन निर्णय -**

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार योजनेच्या प्रस्तावातील कामांचा समावेश असलेल्या **रु. २०.१७ लक्ष (रुपये वीस लक्ष सतरा हजार फक्त) ढोबळ किंमतीच्या कामांना** पुढील अटींच्या अधीन राहून या आदेशान्वये तातडीच्या पाणी पुरवठा योजनेअंतर्गत **प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१) या योजनेसाठी शासनाकडून एकूण खर्चाच्या ९० टक्के म्हणजेच रु. १८.१५ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. तर उर्वरित १० टक्के म्हणजेच रु. २.०२ लक्ष इतकी रक्कम वरोरा नगर परिषदेने लोकवर्गणीच्या रुपाने भरावी.

२) योजनेचे काम तातडीने व गुणवत्तापूर्णरितीने करण्यात यावे.

३) या योजनेच्या देखभाल व दुरुस्ती व व्यवस्थापनाची जबाबदारी वरोरा नगरपालिकेची राहील.

२. या योजनेसाठी अनुदान उपलब्ध करून देण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. हा शासन निर्णय दि.२७ नोव्हेंबर २००२ च्या शासन निर्णय क्र.टंचाई २००२/प्र.क्र.३४५/पापु १४ अन्वये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना/उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक** ***२०१००२०११३१७३६००१*** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.**

**सही /--**
**(सु.वि. कोळेकर)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
८. विभागीय आयुक्त, नागपूर.
९. जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
१०. मुख्य अधिकारी, वरोरा नगरपरिषद, जि. चंद्रपूर.
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर.
१२. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, चंद्रपूर.
१३. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बांधकाम विभाग, चंद्रपूर.
१४.पापु-१४ संग्रहासाठी